**बी.डी.डी. चाळींच्या हद्दीमध्ये असलेल्या सावली इमारतीचा पुनर्विकास करण्याबाबत तसेच त्यामधील सेवानिवासस्थानाच्या बदल्यात द्यावयाच्या पुनर्विकसित गाळयाबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृहनिर्माण विभाग,

## शासन निर्णय, क्रमांक:-संकीर्ण-२०२१/प्र.क्र.२०१/गृनिप

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २८ जानेवारी, २०२२.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक : विविचा-२००७/ प्र.क्र. ५१ (भाग-१) /गृनिप, दि.३०.०३.२०१६
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : जमीन-२५१५/६८१/प्र.क्र.५० (भाग-१)/ज-२, दि.२९.०८.२०१६
३) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग, क्रमांक: बैठक- २०२१/ प्र.क्र.१४८/ गृनिप, दि.१८ ऑगस्ट, २०२१.
४) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ यांचे पत्र क्र.मु.अ./मुं.मं./का.अ./बी.डी.डी./न-७१/७२२/२०२१, दि.२८.१०.२०२१

**<u>प्रस्तावना :-</u>**

तत्कालीन मुंबई विकास विभागाने (बी.डी.डी.) सन १९२१-१९२५ च्या दरम्यान मुंबईतील वरळी, नायगांव, ना. म. जोशी मार्ग व शिवडी येथे एकूण २०७ चाळी बांधलेल्या आहेत. प्रत्येक चाळ ही तळ + ३ मजल्यांची असून त्यात प्रत्येकी जवळपास ८० प्रमाणे रहिवाशी गाळे आहेत. तसेच या बी. डी. डी. चाळींच्या परिसरात झोपडपट्टीसदृश्य बांधकामे स्टॉल्स, दुकाने, सामाजिक / शैक्षणिक संस्था देखील आहेत. सदर बी.डी.डी. चाळी जवळपास ९६ वर्षांपेक्षा जास्त जून्या झालेल्या असल्याने त्यांचा पुनर्विकास करण्याचा निर्णय शासनाने मंत्रिमंडळाच्या मान्यतेने घेतलेला आहे व तसे आदेश वाचा येथील क्र.१ येथील दि.३०.०३.२०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत.

२. बी.डी.डी. चाळींची वरळी येथील भूकर क्र.१५३९ व १५४० वरील राज्य शासनाच्या मालकीची जमीन, उपरोक्त वाचा येथील क्र.१ येथील शासन निर्णय, दि.३०.३.२०१६ मध्ये नमूद प्रयोजनासाठी नाममात्र, रु.१/-दराने भोगवटदार वर्ग- २ म्हणून काही अटी-शर्तींवर वाचा येथील क्र. २ येथील महसूल व वन विभागाच्या शासन निर्णयान्वये, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरणाकडे (म्हाडा) वर्ग करण्यात आली आहे.

३. बी.डी.डी. चाळीतील पोलीस कर्मचाऱ्यांना जी सेवा निवासस्थाने उपलब्ध करुन देण्यात आलेली आहेत, त्या पोलीस सेवानिवास्थानामध्ये, जे पोलीस कर्मचारी दि.१.१.२०११ रोजी वास्तव्यास आहेत, त्यांना किंवा त्यांच्या वारसांना बी.डी. डी. चाळींच्या पुनर्विकासानंतर मालकीतत्वावर बांधकाम खर्चाची रक्कम आकारुन ५०० चौ.फु. क्षेत्रफळाचा गाळा उपलब्ध करुन देण्याचा निर्णय वाचा क्र. ३ येथील दि.१८.८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे.

४. वरळी बी.डी.डी. चाळींच्या परिसरात सावली इमारत ही सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मालकीची इमारत आहे. सदरहू इमारत तळ + ४ मजल्याची असून यामध्ये ४८ शासकीय सेवानिवासस्थाने व सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यालये आहेत. **वरळी बी. डी. डी.** चाळींचा पुनर्विकास करताना सावली इमारतीचा देखील पुनर्विकास करण्याचा तसेच सदरचा पुनर्विकास करताना बी.डी.डी. चाळींतील पोलीस सेवानिवासस्थानातील पोलीस कर्मचाऱ्यांच्या धर्तीवर सावली इमारतीमधील शासकीय अधिकारी-कर्मचाऱ्यांना पुनर्विकसीत गाळयाचे वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

<u>**शासन निर्णय :-**</u>

**वरळी बी. डी. डी.** चाळींचा पुनर्विकास करताना सावली इमारतीचा देखील पुनर्विकास करण्यात यावा. हा पुनर्विकास करताना सावली इमारतीमधील सेवानिवासस्थानामध्ये, आज वास्तव्यास असलेल्यांपैकी जे शासकीय अधिकारी-कर्मचारी दि.१.१.२०११ रोजी **वास्तव्यास होते, त्यांना बी. डी. डी. चाळींच्या पुनर्विकासातंर्गत ५०० चौ. फूट क्षेत्रफळाच्या पुनर्विकसीत गाळ्याचे वितरण मालकी तत्त्वावर करण्यात यावे. त्यासाठी त्यांच्याकडून पुनर्विकसीत गाळ्याच्या बांधकाम खर्चाची रक्कम** (Construction Cost) **आकारण्यात यावी.**

२. **सावली इमारतीमधील सेवा निवासस्थानाचे वाटप सामान्य प्रशासन विभागामार्फत करण्यात आलेले असल्याने, उक्त सावली इमारतीमध्ये** आज वास्तव्यास असलेल्यांपैकी जे शासकीय अधिकारी-कर्मचारी दि.१.१.२०११ रोजी **वास्तव्यास होते, त्या अधिकारी-कर्मचाऱ्यांची यादी /तपशील संचालक, बी.डी.डी.** चाळी व **मुंबई गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळ यांना सामान्य प्रशासन विभागाने उपलब्ध करुन द्यावा. सदर यादी /तपशील तयार करताना आवश्यक त्या कागदपत्रांची खातरजमा करण्याची जबाबदारी सामान्य प्रशासन विभागाची राहील.**

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२२०१२८१६३३४६३१०९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind Tulshiram Shete

Digitally signed by Arvind Tulshiram Shete
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d33ed79e4d2d2921d0ca79b9de78fffaa75e5ff9801ced3d15f5ca38bf6aab62, serialNumber=822dcc756ffe36bfe50f258eb6574ffef985ea24e97243442a9c1b3323aaca40, cn=Arvind Tulshiram Shete
Date: 2022.01.28 16:35:17 +05'30'

**(अरविंद शेटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. सभापती / मा. उपसभापती विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
३) मा. अध्यक्ष / मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
४) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

५) मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, मुंबई
८) मा. मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) मा. मंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०) मा. मंत्री (पर्यटन, पर्यावरण व राजशिष्टाचार), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११) मा. राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व), मंत्रालय, मुंबई
१३) मा. संसद सदस्य / मा. विधान परिषद सदस्य / मा. विधानसभा सदस्य (सर्व)
१४) मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
१५) अपर मुख्य सचिव (सामान्य प्रशासन विभाग/सार्वजनिक बांधकाम विभाग/महसूल विभाग), मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव (गृहनिर्माण), मंत्रालय, मुंबई.
१७) प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका
१९) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, (म्हाडा), गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
२०) मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई.
२१) सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) संचालक, मुंबई विकास चाळी, सावली इमारत, गणपत जाधव मार्ग, वरळी, मुंबई
२३) निवडनस्ती (गृनिप), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई

*** *** ***